**नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तिवेतन प्रणाली अंतर्गत दि.०१.११.२००५ रोजी व त्यानंतर सेवेत प्रथम नियुक्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
शासन परिपत्रक,क्रमांक जिपअ-२०२५/प्र.क्र.४३/आस्था-४
दिनांक: ३० एप्रिल, २०२५.

**वाचा:-**

१. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. रानिप्र-२०२४/प्र.क्र.३५/सेवा-४, दि.३०.०५.२०२४.

**प्रस्तावना:-**

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन प्रणाली अंतर्गत दि.०१.११.२००५ रोजी व त्यानंतर सेवेत प्रथम नियुक्त झालेल्या शासकीय कर्मचाऱ्याची त्याच किंवा अन्य विभागातील /कार्यालयामध्ये नवीन पदावर नियुक्ती करण्यात आली असेल तर सेवानिवृत्ती उपदान व मृत्यू उपदान यासाठी अर्हताकारी सेवेची परिगणना करण्याकरिता शासकीय कर्मचाऱ्याची पूर्वीची सेवा नवीन पदाच्या सेवेस जोडून देण्यासाठी अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत स्पष्टीकरण वित्त विभागाच्या संदर्भिय शासन परिपत्रकान्वये प्रसृत करण्यात आले आहे.

वित्त विभागाचे संदर्भिय शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार, सदर परिपत्रक राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमधील कर्मचाऱ्यांना लागू करण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन परिपत्रक प्रसृत करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक:-**

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील कलम २४८ च्या परंतुकानुसार अनुज्ञेय असलेल्या अधिकारानुसार वित्त विभागाकडील क्र.रानिप्र-२०२४/प्र.क्र.३५/सेवा-४, दि. ३० मे, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील तरतुदी राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमधील कर्मचाऱ्यांना योग्य त्या फेरफारांसह लागू करण्यात येत आहे.

२.  सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२५०४३०१४१२५९११२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

SUBHASH BABAN INGALE

Digitally signed by SUBHASH BABAN INGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ff061387998f39ca303c7da669fe0471ca884215afebe7e53ecc009e02aad1ce,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F0319D46C62F9F6D7DBC200D9693539DF215A28C05D55971515AC3C87DDAA987, cn=SUBHASH BABAN INGALE
Date: 2025.04.30 14:13:50 +05'30'

**( सुभाष इंगळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

मा.विरोधी पक्ष नेता, ( विधानसभा/विधान परिषद ), विधानमंडळ, मुंबई

मा.मंत्री ( ग्राम विकास विभाग ), मंत्रालय, मुंबई

अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

अप्पर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई

महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य ,मुंबई/नागपूर

महालेखापाल, ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

निवासी लेखा अधिकारी, मुंबई

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

सर्व उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई.

सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट,मुंबई.

शासकीय अभियोक्ता, अपील शाखा, रिट सेल, मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद/नागपूर

शासकीय अभियोक्ता, अपील शाखा, रिट सेल, मा.उच्च न्यायालय, मुंबई.

अवर सचिव/कक्ष अधिकारी (आस्था-७, आस्था-८, आस्था-१०, आस्था-१२, आस्था-१४) यांना सदर परिपत्रकाच्या अनुषंगाने प्राप्त प्रकरणांवर कार्यवाही करण्याच्या अनुषंगाने अग्रेषित.

कार्यासन आस्था-४ संग्रहार्थ.